# प्रकरण ४२ वें.



## कथानकाचा शेवट.



आज देशमुखवाडी अगदीं गजबजून गेली होती. मोठे यशवंतराव ऊर्फ अण्णासाहेब परत घरीं आले असें कळतांच त्यांचीं कुळें आणि खाणीवरील सर्व मजूर त्यांना भेटण्याकरितां आले. कर्मधर्मसंयोगानें तो सार्वजनिक रजेचा दिवस असल्यामुळें अण्णासाहेबांबरोबर सकाळीं शहरांतून आलेले त्यांचे बाळमित्र काशीनाथपंत न्यायाधीश आणि मुकुंदशेट त्याचप्रमाणें फौजदार यांना तो सर्व दिवस देशमुखवाडींत अण्णासाहेबांच्या संगतींत घालवितां आला. नऊ वाजण्याच्या सुमारास यशवंताला गाडींत घालून आंबराईंतून घरीं आणलें. त्यावेळीं त्याच्या गाडीबरोबर इतकी गर्दी झाली होती कीं, ती एक मिरवणूकच निघाली आहे असें पाहणारास वाटलें. वाड्यांतून गाडी आंत आल्यावर स्वतः भाऊसाहेबांनीं गाडीचा दरवाजा उघडला आणि यशवंताचा हात धरून त्याला हळूंच खालीं उतरविलें. नंतर एका बाजूला अण्णासाहेब व दुसऱ्या बाजूला भाऊसाहेब असें दोघे दोन बाजूला होऊन त्यांनीं हळुहळूं यशवंताला आंत आणलें. दरवाजांतच सगुणाबाई तिच्या मागें कृष्णी आणि दुसरीं मुलें उभीं होतीं. यशवंताला पाहतांच सगुणाबाईच्या नेत्रांतून प्रेमाश्रु आले.

तो दिवस खरोखरीच मोठा आनंदाचा होता. अण्णासाहेबांनीं त्या दिवसाच्या स्मरणार्थ आपल्या सर्व कुळांना आणि मजूरांना मेजवानी देऊन कुळांची थकलेली सर्व बाकी माफ केली. त्याचप्रमाणें मजुरांना एक महिन्याचा पगार बक्षीस म्हणून दिला. रायबाला दरमहा पांच रुपये मिळत असत ते पंधरा केले. अशा रीतीनें तो सर्व दिवस मोठ्या गडबडीचा होता, तरी अण्णासाहेब स्वतः सर्वांची चौकशी करीत होते. त्या सर्व मंडळींत खाणीवरील हरिभाऊ कुठेंहि दिसला नाहीं, ही गोष्ट प्रभाकराच्या लक्षांत येतांच त्यानें तो न येण्याचें कारण ओळखलें. तेव्हां त्यानें ती गोष्ट शास्त्रीबुवांच्या कानावर

घातली. त्यांनीं सर्वी साधून अण्णासाहेब आणि भाऊसाहेब यांस एका बाजूला नेलें आणि वत्सले संबंधानें सर्व हकीकत त्यांना सांगितली. त्यावर त्यांचा पुष्कळ विचार झाला. आणि शेवटीं हरिभाऊचा पगार वाढवून त्याचें आणि वत्सलेचें लग्न करावें असें ठरलें. सगुणाबाईलाहि तो विचार पसंत पडला.

परंतु फाल्गुन महिन्यांत ठरलेल्या तिथीला चार दिवस राहिले तरी वत्सलेला स्व-च्या लग्नाची गुणगुणहि नव्हती, अशारीतीनें अण्णासाहेबांनीं सर्व गोष्टी गुप्तपणें घडवून आणिल्या. नंतर एके दिवशीं ते, भाऊसाहेब आणि सगुणाबाई एकत्र बसले असता त्यांनीं वत्सलेला बोलाविलें आणि तिला पुष्कळ हितोपदेश करून ' हरिभाऊबरोबर तुझें लग्न ठरविलें आहे ' असें शेवटीं सांगितलें. प्रथम तिची इच्छा नव्हती तरी शेवटीं तिला आपली संमति द्यावी लागली. होतां होतां तिथि-निश्चय केलेला दिवस उगवला. त्या दिवशीं प्रभाकर व कृष्णा यांचें, आणि हरिभाऊ व वत्सला यांचें अशी दोन लग्नें मोठ्या कडाक्यानें झालीं.

यशवंताची प्रकृति आतां पुष्कळ सुधारली आहे. तो आतां खरा मालक होता. अण्णासाहेबांनीं ह्या दोन चार महिन्यांत देशमुखवाडींत आणि खाणीवर स्वतः देखरेख करून पुष्कळ गोष्टी सुधारल्या. त्यांच्या कडक शिस्तीमुळें बाबुराव आतां पुष्कळ सुधारला. भाऊसाहेब आतां पूर्णपणें निवळले. सगुणाबाई आतां पूर्ण सुखी झाली. हल्लीं देशमुखवाडींत सर्वत्र आनंदाचें साम्राज्य पसरलें आहे.

' पुढल्या वर्षी यशवंत आणि कमला यांचा विवाह होण्याचें नक्की ठरलें आहे ' असें आजच प्रभाकरानें आपल्या पत्रांत माधवरावास, त्यानें विचारलें होतें म्हणून लिहिलें आहे.

